राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, मुंबई या कार्यालयातील अस्थायी पदे दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ पर्यंत पुढे चालू ठेवणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- अशसे-२०१७/प्र.क्र.३९५/नवि-१४**
मुख्य इमारत (४ था मजला), हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०३ ऑक्टोबर, २०१८

वाचा: १) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र.एफएफएस-१०८६/सीआर-३५४ /२५२५ /२००३/ नवि-३०, दि.३०.०३.१९९०.
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आपुक, दि.१०.०२.२०१७.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/आपुक, दि.०३.१०.२०१७.
४) शासन निर्णय, नगर विकास विभाग क्र. अशसे-२०१७/प्र.क्र.३९५/नवि-१४, दि.२२.०३.२०१८.
५) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांचे मअसे/२०१८/१-ए/१३९१, दि.११.०९.२०१८.
६) शासन निर्णय, वित्त विभाग क्र. पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.

**शासन निर्णय:-**

राज्य अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील अस्थायी पदांचा आढावा शासनाच्या उच्चस्तरीय समितीमार्फत घेण्यात आला असून या संबंधीच्या आकृतीबंधास शासन निर्णय नगर विकास विभाग क्र. एफएफएस-१६२००३/७५३/प्र.क्र.८६/२००३/नवि-६, दिनांक २०.१०.२००३ अन्वये मान्यता दिली आहे. त्यापैकी १४ अस्थायी पदे दि. ०१.०३.२०१८ ते दि.३०.०९.२०१८ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास संदर्भिय क्र.४ येथील दि.२२.०३.२०१८ च्या शासन निर्णयाव्दारे मान्यता दिली आहे. संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांनी संदर्भिय क्र.५ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने खालील १४ अस्थायी पदांना अग्निशमन प्रशिक्षण केंद्र, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील खालीलप्रमाणे नमूद १४ अस्थायी पदांना वित्त विभागाच्या दि.०७.०९.२०१८ च्या शासन निर्णयानुसार कार्यवाही करण्याच्या अटीच्या अधीन राहून दि.०१.१०.२०१८ ते दि.२८.०२.२०१९ या कालावधीसाठी मुदतवाढ या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | पदाचे नाव | संख्या |
|---|---|---|
| १ | वरिष्ठ प्रशिक्षक | १ |
| २ | अधिक्षक (वर्ग-३) | १ |
| ३ | लेखापाल | १ |
| ४ | लघुलेखक (मराठी-निम्नश्रेणी) | १ |
| ५ | कनिष्ठ प्रशिक्षक | १ |
| ६ | अग्निशमन प्रणेता | १ |

| | | |
|---|---|---|
| ७ | चालक- यंत्र चालक | १ |
| ८ | अग्निशामक | ४ |
| ९ | शिपाई | १ |
| १० | सफाई कामगार | १ |
| ११ | रखवालदार | १ |
| | **एकुण** | **१४** |

२. वरील पदांवर होणारा खर्च मागणी क्र. "एफ-२, मुख्य लेखाशिर्ष, २०७० इतर प्रशासनिक सेवा, १०८ आगीपासून संरक्षण व नियंत्रण, (००) (०३) संचालन व प्रशासन, शासनाच्या अग्निशमन सल्लागारांच्या प्रशिक्षणार्थ्यांच्या आस्थापनेवरील खर्च, दत्तमत्त-(२०७० ०५७७)" या लेखा शिर्षांतर्गत खर्ची टाकण्यात येऊन, सन २०१८-१९ च्या मंजूर वित्तीय तरतूदींमधून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दिनांक ०७.०९.२०१८ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यांत येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१००४१११७५९६०२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay S Gokhale

Digitally signed by Sanjay S Gokhale
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ab8a7eeedad158d24cf530f0d6b662808245be49a8459ed4c63961ebdc3cb961, cn=Sanjay S Gokhale
Date: 2018.10.04 11:20:11 +05'30'

**( सं.श.गोखले )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा. राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) स्वीय सहायक, प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५) स्वीय सहायक, प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
६) संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय, सांताक्रुझ(पू), मुंबई-४०० ०९८.
७) महालेखाकार, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
८) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०० ०५१
९) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१०) वित्त विभाग (व्यय-३/सुधारणा/ अर्थसंकल्प-१६) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
११) कक्ष अधिकारी, (नवि-३/नवि-४), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई.
१३) निवडनस्ती (नवि-१४).